# नेटाक्षरी

ई-साहित्य प्रकाशन

अंक ४६, दिनांक २ ऑक्टोबर २००९



संपादक

भारती सरमळकर (मुंबई)

सह संपादक

सोनाली घाटपांडे (पुणे)
स्वप्ना कोल्हे (नाशिक)
अहं ब्रह्मास्मि (पुणे)
सचिन काकडे (मुंबई)

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.
netaksharee@gmail.com

## ...दळण...

ग्रीष्म येता अंगणी एकेक पान लागे गळावया
सरत आले आयुष्य आपले त्यांना लागे कळावया

क्षण क्षण ठेचून वेचून ऋतू ऋतू घेत जगूनं
जगणं सहज देती झोकून देह अंती जळावया

त्यात एक द्वाडं पान झुलतं झुले हरपून भानं
समीर येता कापरं भरून उडी मारे पळावया



झाड म्हणे हसून बाळा ऋतूचक्राचा खेळ सारा
फिरून पुन्हा येशील फुलून अंग सारे मळावया

सृष्टी म्हणते पृथ्वीचे हे सूर्य फिरवितो जाते
जगणे मरणे पुन्हा उमलणे , दळणे दळावया

**...मंगेश बिरारी (लंडन, यु.के)...**

# ...श्वास...

श्वासाहून तुझ्यावरी माझा, विश्वास होता
आयुष्य तुच माझे , माझा तुच श्वास होता
त्या विरलेल्या हाका
या उरलेल्या वाटा
साद घालती पुन्हा
या उसळत्या लाटा
खरच ओलावले डोळे का पुन्हा भास होता
आयुष्य तुच माझे, माझा तुच श्वास होता
हळव्या तुझ्या आठवणी
ग़ातात तुझीच गाणी
अर्ध्यावर संपलेली
दाटते डोळ्यात कहाणी
तुच गाण्यात माझ्या तुच स्वरात होता
आयुष्य तुच माझे माझा तुच श्वास होता



ओठावरी तुझेच नाव
काळजात तुझेच घाव
जखमा भरण्यासाठी
मींही सोडले ते गावं
तु देहात माझ्या तु प्रत्येक श्वासात होता
आयुष्य तुच माझे माझा तुच श्वास होता
ओघळतो हा किनारा
सळसळतो हा वारा
या वादळाने केला
जिवनाचा हा पसारा
तुच सागर माझा तुज आकाश होता
आयुष्य तुच माझे माझा तुच श्वास होता

**....सुधीर एक निवडुंग...**

# ...अनमोल...

आजची पहाट जरा वेगळी होती
स्वप्न खुणवत होती

सर सर धुळ उडवत आमच्या बैल गाडीने
कधी गावाची वेस ओलांडली कळलेच नाही
अखेरचा दंडवत करून गावाला
मीही आता झाले शहराची

पण आजही आठवते वेशी बाहेरचे
मारुतिचे मंदीर, पिंपळाचा पार
वडाच्या पारंब्या, पारंबीचे झोके
अन ती .... निरागस नाती

आजची पहाट जरा वेगळी होती
ओढ लावत होती गावाकडची माती
ओढा ओलांडून कधी गावात आलो
कळलेच नाही ...
पण गाव खूप वेगळे होते



पाय वाट जाऊन रस्त्याचे चौपरीकरण होते
कौलारु घर जाऊन टॉवर , मॉल आले होते
रस्त्यावर मात्र आजही दिसत होता
रंग पंचमीचा रंग
अन गणपतीचा गुलाल

ती पायवाट मात्र हरवली होती
अन त्या निरागस नात्यांना ही
शिंग फुटली होती

आता कीती पैसे मोजले तरी
ती पायवाट  मिळणार नव्हती
अन ती निरागस नाती ...मिळणार नव्हती

**...आरती कुळकर्णी...**

# ...स्वप्नात जागवलेस तू...

नात्यात बांधुनी मला
रडता हसवलेस तू
डोळ्यात झोप येता
स्वप्नात जागवलेस तू...

काही शब्द तुझे होते
काही मी दिले
शब्दांच्या ह्या खेळात
नवे अर्थ आले
काही अर्थात माझ्या
भाव आणलेस तू...

ओळख होती नवीच
जुने काही वाटायचे
तुझ्या नसण्याच्या ओळखीतही
मी मला भेटायचे
काही माझ्या ओळखीच्या
जाणीवे आलास तू...




नसे जरी काही आपल्यात
आपलेच काही असायचे
नसताही भाव नात्यातं
भाव मला शोधायचे
काही माझ्या भावाला
प्रेम दिलेस तू...

रात्र ती संपली नाही
डोळ्यात मी जागली
तुझ्या ओढ़ीत जायचे
स्वप्नासाठी झोपली
काही माझ्या स्वप्नासाठी
अजूनही जागवलेस तू...

**...प्रिती खेडेकर...**

# ...स्त्री मन...

नात्यांची भावनिक गुंफण
त्यात थोडी रागाची वेसणं
सोबत थोडं प्रीतीच विरजणं
अस असत स्त्रीमन

गुंतलेला धागा सोडविणं
त्यासाठी कष्ट उपसणं
जबाबदारीच ओझं वागविणं
अस असत स्त्रीमन

दुःखातही न डगमगणं
इतरांनाही त्यात सावरणं
जिद्द चिकाटिने लढणं
अस असतं स्त्रीमन



कोणाची पत्नी असणं
त्यातच तिचं आई असणं
परी सांभाळणं सासर पण
अस असत स्त्रीमन

स्वतःच स्त्रीपण जपणं
मनातील भावविश्व उलगडणं
हिम्मतीने सारं आकाश लेपणं
अस असत स्त्रीमन

...साक्षी सुर्वे...

# ...तर बिघडले कुठे...

चार दिवस सासूचे
चार दिवस सुनेचे
मग चार दिवस सास-याने घेतले
तर बिघडले कुठे ?

समोरचा फिरतोय गाडीने
शेजारचा बघतोय रागाने
मग शिमगा केला मनाने
तर बिघडले कुठे ?

आयुष्य होरपळतय सुडाने
जगणही मरतय कणाकणाने
मग मीही हसलो निराशेने
तर बिघडले कुठे?



माणसात वाहतायत भेसळीचे वारे
दाण्यात असतात विटेचे खडे
मग आंब्याने झाले आंबट चवीने
तर बिघडले कुठे?

वारा वाहतोय खुनशीने
नदीही वाहतेय रागाने
मग धरा तापली तापाने
तर बिघडले कुठे ?

हिंदुच्या मुखी राम बसे
मुस्लीम मुखाने अल्ला वदे
मग मी जगलो माणूसकीने
तर बिघडले कुठे ?

**...पराग नेवे (प्राग)...**

# ...तारुण्य...

तारुण्य हे पावसातल्या एका बेडकासारखं असतं
तळ्यातं असताना तेवढच आपलं विश्व असतं
बाहेर पडल्यावर मात्र एक मोठ आभाळ असतं
उड्या मारताना खूप मजा असते
पण चाकाखाली जाण्याची सुद्धा शक्यता असते

तारुण्य हे एका फुलासारखं असतं
कळीत असताना एका चकोरीत सेफ असतं
फुलल्यावर मात्र टिकवण्याची जबाबदारी असते
पण त्यातसुद्धा एक मोहकता असते
कोमेजून जायची शक्यता असते
पण स्वतःला सांभाळायला तेच पुरेसे असते

तारुण्य हे एका स्वच्छंदी पक्षासारखं असतं
जवळ असताना भरारी घेण्याचं स्वप्न असतं
भरारी घेतल्यावर जमिनीवर लक्ष ठेवावच लागतं
नाहीतर घरटं विसरुन जाणारच असतं



तारुण्य म्हणजे एक सळसळत रक्त असतं
चटकन राग पटकन द्वेष
चटकन हासू पटकन आसू असतं

तारुण्य एक वारा असतो उधाण
तर ते वादळ असते एक तुफान
वा-याच्या वेगाचा सामना करायचा असतो
पण वादळाला पुकारायचा तोटा सहन करायचा असतो

हेच ते तारुण्य जपल तर सार काही
आणि सोडलं तर उध्वस्तच सारं काही
उध्वस्तचं सारं काही

**...श्रद्धा खाडे...**

# ...दोन प्रेतं...

एकदा दोन प्रेतं जळत होती सरणात
एक होता साग़ावर एक होता चंदनात ||धृ||

सागावरलं बोललं मी होतो शेतकरी
रक्ताचं पानी करून रोज कष्ट करी
लाख संकट आली माझ्या आयुष्यावरी
नाही भ्यायलो त्यांना तरी बसलो घरी
चार दिवस सुखाचे मीही ग्रहण केले
पण ते अत्तराचे क्षण हातातून गेले
माझ्या स्वप्नांना मी पिंजर्यात पाहिले
कष्ट करता करता मला जगायचेच राहीले
आली नाही मजा या जिवनरूपी मरणात ||१||

चंदनावरील प्रेत मात्र गप्प राहीलं
सरणालाही त्याने अश्रूंच फुल वाहीलं
मग हळूच काही शब्दात तेही चोरून बोललं
श्रीमंतीच्या पडद्यामागील पुस्तक त्याने खोललं
आयुष्यात त्याने खूप पैसा कमाविला
घर सोडून बाहेर त्याने जीव रमविला
पण एकच दुःख त्याच्या अंतर्मनात होतं
पैशाशिवाय आयुष्यात काहीच जास्त नव्हतं
म्हणून जीवन सोडून आलो मृत्यूच्या शरणात ||२||



मग राख होऊन दोघेही पाण्यात गेले
काय दूर गेलं आणि काय हाती उरले
साग़ाने केले काय अन काय चंदनाने केले
सरणाची राख करून त्यांना पाण्यातच नेले
म्हणून सांगतो तुम्हाला गरीब वा श्रीमंत
मृत्यूनंतर असते सर्वांना असते एकच खंत
तत्वूर्वी करू स्वतःचा दुष्टांत
संकट आली कितीही तरी हसत होईल अंत
नका करू फरक आता अभिमन्यू आणि कर्णात ||३||

...विक्रम वाडकर...

काव्यांजली आणि मराठी कविता तुमच्यासाठी घेऊन येत आहेत

**नवरस काव्यस्पर्धा मालिका**

यात आहेत साहित्यातील नऊ रस
प्रत्येक स्पर्धा एका रसावरील कवितांची
नऊ रस नऊ स्पर्धा.. एक महामालिकाच म्हणाना!!!

दर महिन्याला एक रस – तब्बल नऊ महिने चालणारे ही धम्माल !!!
काव्यस्पर्धेचा उद्देश 'चढाओढ' हा नाही,
कोणी छोटं - मोठं, कविता चांगली वाईट सिद्ध करणं हा ही नाही.
ही स्पर्धा आपल्या प्रतिभेला आव्हान आहे, सृजनशक्तीला आवाहन आहे.
निवडक कविता नेटाक्षरीमध्ये प्रसिद्ध होतील, हजारोंपर्यंत जातील, बक्षीसेही असतीलच
लिहा मंडळी ! बघुया महाराष्ट्राच्या उद्याच्या 'लेखण्या' काय आहेत ते!

**या महिन्याचा रस विषय आहे "भय (भयानक)"**

तुमच्या 'भयरस' पूर्ण कविता आम्हाला १५ ऑक्टोबर, २००९ पर्यंत
marathikavitamarathispardha@gmail.com
वर पाठवा.
सोबत आपल्या ऑरकुट प्रोफाईलची व ब्लॉगची लिंक नक्की पाठवा
अधिक माहिती कम्युनिटीवर मिळेल.

---

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडीत आहे.दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणित होतो आहे. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ४०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. ह्याव्यतिरिक्त वेबसाईटवर व्हिजीट करुन वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या मित्रपरिवारास फॉरवर्ड करण्यास आमची काहीही हरकत नाही. सोबतच,असे करतांना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आपले अत्यंत आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक एक लक्ष वाचकांपर्यंत पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

हा अंक विनामुल्य मिळवण्यासाठी, तसेच सूचना-अभिप्राय व प्रतिक्रियांसाठी
**netaksharee@gmail.com**